आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील निधी वितरण. ( कार्यक्रम खर्च "मागासवर्गीय कल्याण "- वेतन )

**महाराष्ट्र शासन.**

**आदिवासी विकास विभाग**

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२०/ प्र.क्र. ०१ / कार्यासन-६

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- ८ मे, २०२०.

वाचा -

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४ /अर्थ-३, दि.१६.०४.२०२०.

२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, समक्रमांक, दि.२१.०४.२०२०.

**शासन निर्णय-**

सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०२० (महाराष्ट्र विनियोजन अधिनियम,२०२० यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रक्कमांसह) यास विधानमंडळाने मंजूरी दिली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिली आहे आणि ते सन २०२० चा महाराष्ट्र अधिनियम क्र.१५ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग-४, दि.१८.०३.२०२० मध्ये प्रसिद्ध करण्यात आले आहे.

त्यानुषंगाने वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील दिनांक १६ एप्रिल,२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या पहिल्या ३ महिन्याकरिता (जून, २०२० अखेर) अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या एकूण वार्षिक अर्थसंकल्पित तरतूदींच्या १५ ते २५ टक्क्यांच्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. त्यानुसार आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कार्यक्रम खर्चातील मागणी क्रमांक टि-५ मधील **“मागासवर्गीयांचे कल्याण”** या उपविकास शिर्षाखालील योजनांकरिता वित्त विभागाच्या संदर्भाधीन शासन परिपत्रकामध्ये नमूद ठराविक उद्दीष्टांसाठी एकुण अर्थसंकल्पीय तरतूदींपैकी **१० टक्के निधी संबंधित** नियंत्रक अधिकारी यांना वितरीत करण्यात आला आहे. सद्यस्थितीत वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS) ०१-वेतन व ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टांकरीता एकूण अर्थसंकल्पित तरतूदींच्या २० टक्क्यांच्या मर्यादेत निधी वितरणासाठी उपलब्ध करून देण्यात आला आहे. ही बाब विचारात घेऊन कार्यक्रम खर्चांतर्गत सोबतच्या विवरणपत्रात नमूद मागणी क्रमांक टी-५ मधील योजनांकरिता ०१-वेतन व ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टांच्या वितरणासाठी उपलब्ध तरतूदींपैकी उर्वरीत **१० टक्के निधी** संबंधित नियंत्रक अधिकारी यांना **वितरीत करण्यास** व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. लॉक डाऊनमुळे पुढील ३ ते ४ महिने राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरूपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाय योजना करुन खर्च करावा. सदर निधीचा वापर नियमित वेतन अदायगीकरीताच करण्यात यावा. सद्यस्थितीत कोणत्याही प्रलंबित दायित्व (Arrears) अदा करण्यासाठी वापर करण्यात येऊ नये.

३. विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी स्तंभ क्र. ५ मध्ये दर्शविलेल्या तरतुदी त्यांच्या अधिपत्याखालील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना तात्काळ वितरित कराव्यात. तसेच सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१६.०४.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००४२४१०१२१०१९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2020.05.08 16:49:32 +05'30'

**(रविंद्र दि.औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
२. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक.
४. व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६. उपसंचालक, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र पडताळणी समिती(सर्व).
७. महालेखापाल (लेखापरिक्षण) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
८. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१०. वित्त विभाग (कार्यासन व्यय-१४ व अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई.
११. सर्व उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
१३. निवड नस्ती (का-६).

**शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.बीयुडी-२०२०/प्र.क्र.१/का.६, दिनांक: ८ मे,२०२० सोबतचे विवरणपत्र**

(रु. हजारात)

| अ. क्र. | मागणी क्रमांक / मुख्य लेखाशिर्ष | बाब/उद्दिष्ट | सन २०२०-२१ साठीची अर्थसंकल्पिय तरतूद | वितरित करण्यात येत असलेली १० % तरतुद | नियंत्रक अधिकारी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | **मागणी क्रमांक टी-५** | | | | |
| | **०२, अनुसूचित जमातीचे कल्याण, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना** | | | | |
| | **२२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण** | | | | |
| १ | (०१) (०१) आदिवासी विकास आयुक्तालय **(२२२५ १३९३)** | ०१-वेतन | ५०००००.०० | ५००००.०० | आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक |
| २ | (०१) (५९) मुलांसाठी व मुलींसाठी शासकीय वसतीगृह(राज्यस्तरीय योजना) **(२२२५ डी७२५)** | ०१-वेतन | ८५००००.०० | ८५०००.०० | आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक |
| ३ | (०१) (६०) आश्रमशाळा समूह (राज्यस्तरीय योजना) **(२२२५ डी७३४)** | ०१-वेतन | ६७५००००.०० | ६७५०००.०० | आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक |
| ४ | (०१) (७३) स्वंयसेवी संथाना आश्रमशाळा व मुलोद्योगोत्तर आश्रमशाळा चालविण्यासाठी सहायक अनुदान **(२२२५ एफ१२९)** | ३६-सहायक अनुदाने (वेतन) | ७८०००००.०० | ७८००००.०० | आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक |
| ५ | (०२) (२४) अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती **(२२२५ ४१२२)** | ०१-वेतन | २५००००.०० | २५०००.०० | आयुक्त, आदिवासी विकास संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे |
| | **एकुण (२२२५ )** | | **१६१५००००.००** | **१६१५०००.००** | |
| | **२४२५-सहकार** | | | | |
| | **जनजाती क्षेत्र उपयोजना** | | | | |
| ६ | (०१) (०८) महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळाला वित्तीय सहाय्य **(२४२५ ०८५३)** | ३६-सहायक अनुदाने (वेतन) | २२८०६९.०० | २२८०६.९० | आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक |
| ७ | (०१)(१०) शबरी आदिवासी विकास महामंडळाला वित्तीय सहाय्य **(२४२५ १३५९)** | ३६-सहायक अनुदाने (वेतन) | २२०००.०० | २२००.०० | आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक |
| | **एकुण (२४२५ )** | | **२५००६९.००** | **२५००६.९०** | |
| | **एकूण मागणी क्र.टी.५** | | **१६४०००६९.००** | **१६४०००६.९०** | |